राज्य योजना सन २०१८-१९
**गोरेगांव आरे वसाहत, मुंबई येथे आंतराष्ट्रीय स्तराच्या प्राणी संग्रहालयाची स्थापना (२४०६-८२०१) निधी वितरीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-११.१८/प्र. क्र.४४९/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :-

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-२४ / वअं/लेखा/प्र. क्र. ३०/प्रमं /४८४/२०१७-१८, नागपूर, दिनांक :- ०३.०९.२०१८.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-१०.१७/प्र. क्र. ३५४/फ-१, दिनांक :- १२.११.२०१८.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/यो/चाबाप्र/प्र.क्र.५३/(१८-१९)/१४०१, दिनांक :- १३.११.२०१८.

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ राज्यस्तरीय योजनेअंतर्गत गोरेगांव आरे वसाहत, मुंबई येथे आंतराष्ट्रीय स्तराच्या प्राणी संग्रहालयाची स्थापना (२४०६-८२०१) या लेखाशिर्षांतर्गत रुपये १००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये गोरेगाव येथील प्राणी संग्रहायलयाची स्थापनेकरीता सलोह क्राकीट भिंत बांधणे रु. १,०९,४९,२००/- च्या अंजदापत्रकास प्रशासकिय मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर केला होता. सदर प्रस्तावास संदर्भ कमांक :- ३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये सन २०१८-१९ करीता गोरेगांव आरे वसाहत, मुंबई येथे आंतराष्ट्रीय स्तराच्या प्राणी संग्रहालयाची स्थापना (२४०६-८२०१) या लेखाशिर्षांतर्गत **रु. १,०९,४९,२००/-** निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक २ व ४ च्या पत्रान्वये गोरेगांव आरे वसाहत, मुंबई येथे आंतराष्ट्रीय स्तराच्या प्राणी संग्रहालयाची स्थापना (२४०६-८२०१) या योजनेंतर्गत सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ च्या शासन परिपत्रक व वितरणासाठी उपलब्ध असलेल्या निधीच्या अधीन राहून रु. ७०.०० लक्ष निधी खर्च करण्यास खालील अटींन्वये शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१५-१६ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, उपशीर्ष ०२ पर्यावरणीय वनीकरण, व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे जतन योजना (००) (१७) गोरेगांव येथे आंतरराष्ट्रीय स्तराचे प्राणी संग्रहालय स्थापन करणे (आरे कॉलनी), मुंबई (राज्य) (२४०६ ८२०१) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

४. प्रस्तावित असलेल्या मोठ्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधित जबाबदारी नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

५. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

६. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक - १७.०४.२०१५, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.४.२०१८ व महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-१०.१७/प्र. क्र. ३५४/फ-१, दिनांक :- १२.११.२०१८ च्या शासन निर्णयाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११७१६४४५१६४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2018.11.17 16:50:28 +05'30'

(स्वप्निल देशभ्रतार)
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.
६. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
७. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.